**बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि बॅकवॉटर (पश्चजल) विकास (३०५१ ०७६८) या योजनेसाठी सन २०१६-१७ साठी निधी खर्च करणयास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी-०३१७/प्र.क्र.५२/बंदरे-२**

गृह विभाग, मंत्रालय
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ मार्च, २०१७

वाचा :- मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ/अभि-३/ मांडवा रो-रो-३/निधी वितरण प्रस्ताव/१६-१७/१०१, दिनांक ०४ मार्च, २०१७.

**शासन निर्णय :-**

बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर (पश्चजल) विकास या योजनेकरिता, "मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र. ३०५१- बंदरे व दिपगृहे, (८०) सर्वसाधारण, (१९०), सार्वजनिक उपक्रम व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) सागरी मंडळास (मेरीटाईम बोर्डास) सहाय्यक अनुदान, (०१)(०८) बंदरापर्यंत रस्ते/रेल्वे मार्ग बांधणे आणि बॅकवॉटर (पश्चजल) विकास (योजनांतर्गत) (३०५१ ०७६८), ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.३६.०० कोटी तरतुदीपैकी ८०% च्या मर्यादेत रु. २८.८० कोटी (रु. अठ्ठाविस कोटी ऐंशी लक्ष) इतकी तरतूद मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी नियमाप्रमाणे खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०३१७१५०६५०४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok H Damayyawar

Digitally signed by Ashok H Damayyawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok H Damayyawar
Date: 2017.03.17 15:08:46 +05'30'

**(अ. ह. दमय्यावार)**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
६) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
७) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
९) विशेष कार्यकारी अधिकारी (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय
१०) अवर सचिव, बीयुडी-१, गृह विभाग.
११) निवडनस्ती(बंदरे-२)